

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
मुख्य इमारत, १ ला मजला, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दुरध्वनी क्रमांक -२२०४८२४७-०२२ ई मेल- deskkh२-rfd@mah.gov.in

---

क्रमांक: अपील-४१-अ/०२२१/प्र.क्र.५९/ख-२ दिनांक:- ०१ ऑक्टोबर, २०२१.

**विषय :- गौण खनिज-बीड**
"सन २०१४-१५ मौजे सावरगांव ता.गेवराई या वाळूगटातून उत्खनन न करता आलेल्या वाळूची रक्कम परत करणेबाबत".
**श्री. मदन तुकाराम म्हस्के, रा. पालवण, ता.जि. बीड**

**शासन ज्ञापन:-**

जिल्हाधिकारी, बीड यांना त्यांचे पत्र क्र.२०१४/गौण खनिज/वा.लि.८/५/बी, दिनांक १६.०२.२०२१ रोजीच्या पत्राच्या अनुषंगाने कळविण्यात येते की, सन २०१४-१५ करीता दिनांक २१.०१.२०१५ रोजी ठेवलेल्या ई-लिलावामध्ये मौजे सावरगाव, ता. गेवराई जि. बीड हा वाळूगट ३१५३ ब्रास वाळूसाठ्याकरीता श्री. मदन तुकाराम म्हस्के यांना रू.२,००,३४,५९८/- (मात्र दोन कोटी चौतीस हजार पाचशे आठ्ठ्याण्णव रूपये) इतक्या सर्वोच्च रक्कमेस मंजूर करण्यात आला आहे. लिलावधारक श्री. म्हस्के यांनी सदर वाळूगटाची लिलावाची संपुर्ण रक्कम शासनजमा केल्यानंतर वाळूगटाचा ताबा देण्यात आला.

२. सदर वाळूगटातून वाळू उत्खननास विरोध करण्याबाबतची निवेदने देण्यात आली तसेच तहसिल कार्यालय, गेवराई समोर उपोषण करण्यात आले. जिल्हास्तरीय समितीने सदर वाळूगटातून वाळू उत्खनन करण्यास संमती देण्यात आली. जिल्हाधिकारी कार्यालयाच्या दिनांक १८.१०.२०१६ रोजीच्या पत्रान्वये लिलावधारक यांनी वाळूगटातून ३१५३ ब्रास वाळू उत्खनन केल्याने अनामत रक्कम परत करणे उचित होणार नसल्याबाबत कळविले. सदर अहवालाच्या विरूध्द लिलावधारक यांनी अपर विभागीय आयुक्त, क्र.०२ औरंगाबाद यांच्याकडे अपील दाखल केले असता, सदर अपीलावर अपर विभागीय आयुक्त, क्र.०२ औरंगाबाद यांनी दिनांक ३०.१०.२०१९ रोजी, प्रकरण अपर जिल्हाधिकारी, बीड यांच्याकडे चौकशीसाठी पाठविण्यात येते असे आदेश दिले. सदर आदेशाविरूध्द लिलावधारकाने मा. राज्यमंत्री (महसूल) यांच्याकडे अपील दाखल केले असता, मा. राज्यमंत्री (महसूल) यांनी दिनांक ०४.०६.२०२१ रोजीच्या आदेशान्वये लिलावधारक यांना मंजूर ३१५३ ब्रास मंजूर वाळू साठ्यातील उत्खनन न करता आलेल्या १७३८ ब्रास वाळूची रक्कम, अनामत रक्कम व इतर रक्कम परत करण्याचे आदेश पारीत केले. त्याअनुषंगाने लिलावधारक यांना उत्खनन न करता आलेल्या वाळूची रक्कम रु.१,१०,४३,४७७/- (मात्र एक कोटी दहा लाख त्रेचाळीस हजार चारशे सत्त्याहत्तर रूपये) परत करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

३. सबब, श्री. मदन तुकाराम म्हस्के यांना रक्कम रु.१,१०,४३,४७७/- (मात्र एक कोटी दहा लाख त्रेचाळीस हजार चारशे सत्त्याहत्तर रूपये) इतकी रक्कम, त्यांनी लिलावाची रक्कम प्रत्यक्षात शासनाकडे जमा केल्याची व यापूर्वी ही रक्कम अदा केलेली नाही याची खातरजमा करुन घेण्याच्या अटीवर अदा करण्यास शासन ज्ञापनाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

४. या बाबीवर होणारा खर्च सन २०२१-२२ या वर्षाकरीता लेखाशिर्ष "०८५३-अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग "१०२- खनिजबाबत सवलत फी व स्वामित्वधन, ९००, अलोहयुक्त खाणकाम व धातुशास्त्रीय उद्योग-वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६) खाली वजा परतावे देण्याकरीता करण्यात आलेल्या उपलब्ध अंदाजपत्रकीय तरतूदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

५. सदर शासन ज्ञापन वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक अनौ सं.२९२/२०२१/व्यय-९, दिनांक ३०.०७.२०२१ अनुसार दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२११००११७४७४३३४१९ असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SADANAND GOVIND MOHITE

Digitally signed by SADANAND GOVIND MOHITE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9bd008875b6a3a9fddad3e55fe0328df13a27221cb2bbc67abd0155f914efc01, pseudonym=F963BC6AD59D767D7C33C1B8350D778425D54B0E, serialNumber=6590E2301450C474B246074049174C79201BCAD9E5EB15E8F21C282EAEFEDA38, cn=SADANAND GOVIND MOHITE
Date: 2021.10.01 17:48:51 +05'30'

**( स. गो. मोहिते )**
**कक्ष अधिकारी, महसूल व वन विभाग**

**प्रति,**

**जिल्हाधिकारी, बीड** .

**प्रत:**

१) विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.
३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, नागपूर.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, बीड.
५) वित्त विभाग, (व्यय-९/ अर्थसंकल्प -३ ६ ,व १४ कार्यासने (मंत्रालय, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई -४०० ३२.
६) कार्यासन अधिकारी (ब-१ कार्यासन) महसूल व वन विभाग, मंत्रालय, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई -४०० ३२.
७) निवडनस्ती "ख-२" कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई -४०० ३२.